केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य कार्यक्रमाकरीता सर्वसाधारण योजनेंतर्गत सन २०१९-२० च्या अर्थसंकल्पिय तरतुदीतून केंद्र हिश्श्यापोटी दुसऱ्या हप्त्याचे रू.२५९८८.०० लक्ष व राज्य हिश्श्यापोटी रु.१७३२५.३३ लक्ष अनुदान वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एनएचएम-०९१९/प्र.क्र.४७५/आरोग्य-७**
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : २६ नोव्हेंबर, २०१९

वाचा :-

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक १ एप्रिल, २०१९.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ८ जुलै, २०१९.
३) केंद्र शासनाचे पत्र क्र. G.२७०१८/०१/२०१९-NHM-F- NDCP, दिनांक ०९ जुलै, २०१९.
४) केंद्र शासनाचे पत्र क्र. G.२७०१८/०१/२०१९-NHM-F- NDCP, दिनांक ०३ जुलै, २०१९.
५) केंद्र शासनाचे पत्र क्र. G.२७०३४/१०७/२०१९-२०-NHM Finance/१, दिनांक १६ सप्टेंबर, २०१९.
६) केंद्र शासनाचे पत्र क्र. G.२७०३४/१०७/२०१९-२०-NHM Finance/४, दिनांक १६ सप्टेंबर, २०१९.
७) केंद्र शासनाचे पत्र क्र. G.२७०३४/१०७/२०१९-२०-NHM Finance/५, दिनांक १६ सप्टेंबर, २०१९.
८) केंद्र शासनाचे पत्र क्र. G.२७०३४/१०७/२०१९-२०/NHM-Fin/१, दिनांक १९ सप्टेंबर, २०१९.
९) केंद्र शासनाचे पत्र क्र. G.२७०१७/३५/२०१९-२०/NHM-(F)४, दिनांक १९ सप्टेंबर, २०१९.
१०) केंद्र शासनाचे पत्र क्र. G.२७०१७/३५/२०१९-२०/NHM-(F)/१०, दिनांक १९ सप्टेंबर, २०१९.
११) केंद्र शासनाचे पत्र क्र. G.२७०१७/३५/२०१९-२०-NHM- (F)/५, दिनांक १९ सप्टेंबर, २०१९.
१२) केंद्र शासनाचे पत्र क्र. G.२७०१७/३५/२०१९-२०-NHM Finance/१३, दिनांक १९ सप्टेंबर, २०१९.
१३) केंद्र शासनाचे पत्र क्र. G.२७०१८/०१/२०१९-NHM-F-NDCP, दिनांक १९ सप्टेंबर, २०१९.
१४) केंद्र शासनाचे पत्र क्र. G.२७०१८/०१/२०१९-NHM-F-NDCP, दिनांक १९ सप्टेंबर, २०१९.
१५) केंद्र शासनाचे पत्र क्र. G.२७०१७/३५/२०१९-२०/NHM-(F)/१०, दिनांक २० सप्टेंबर, २०१९.
१६) केंद्र शासनाचे पत्र क्र. G.२७०१८/०१/२०१९-NHM-F-NDCP, दिनांक २० सप्टेंबर, २०१९.

१७) केंद्र शासनाचे पत्र क्र. G.२७०१८/०१/२०१९-NHM-F-NDCP, दिनांक २० सप्टेंबर, २०१९.

१८) केंद्र शासनाचे पत्र क्र. G.२७०१७/३५/२०१९-२०-NHM- Finance/१, दिनांक २० सप्टेंबर, २०१९.

१९) केंद्र शासनाचे पत्र क्र. G.२७०१७/३५/२०१९-२०-NHM-(F) Part१/४, दिनांक २० सप्टेंबर, २०१९.

२०) केंद्र शासनाचे पत्र क्र. G.२७०१७/३५/२०१९-२०-NHM-(F) Part१/५, दिनांक २० सप्टेंबर, २०१९.

२१) केंद्र शासनाचे पत्र क्र. G.२७०१७/३५/२०१९-२०-NHM Finance/१३, दिनांक २० सप्टेंबर, २०१९.

२२) केंद्र शासनाचे पत्र क्र. G.२७०१८/०२/२०१९-NHM-F-E, दिनांक २४ सप्टेंबर, २०१९.

२३) केंद्र शासनाचे पत्र क्र. G.२७०१८/०२/२०१९-NHM-F-E, दिनांक २४ सप्टेंबर, २०१९.

२४) केंद्र शासनाचे पत्र क्र. G.२७०१८/०२/२०१९-NHM-F-E, दिनांक २४ सप्टेंबर, २०१९.

२५) केंद्र शासनाचे पत्र क्र. G.२७०१८/०२/२०१९-NHM-F-E, दिनांक २४ सप्टेंबर, २०१९.

२६) केंद्र शासनाचे पत्र क्र. G.२७०१८/०२/२०१९-NHM-F-NCD, दिनांक २६ सप्टेंबर, २०१९.

२७) केंद्र शासनाचे पत्र क्र. G.२७०१८/०२/२०१९-NHM-F-NCD, दिनांक २६ सप्टेंबर, २०१९.

२८) संचालक, वित्त व लेखा, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांचे क्र.राआसोम/एफएमजी/कें.रा. हि./६४०१९-२६/२०१९-२०, दिनांक १४ ऑक्टोंबर, २०१९.

**<u>प्रस्तावना :-</u>**

ग्रामीण जनतेस सहजसाध्य, परवडण्याजोगी, कार्यक्षम, उत्तरायी आणि विश्वासार्ह आरोग्य सेवा उपलब्ध करून देण्याच्या अनुषंगाने केंद्र शासनाने संपूर्ण देशात एप्रिल, २००५ पासून राष्ट्रीय ग्रामिण आरोग्य अभियान सुरू केले आहे. सदर योजनेअंतर्गत प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रम (Reproductive child Health), नियमित लसीकरण, मिशन फ्लेक्सीपुल, पायाभूत सुविधांचे बळकटीकरण व पल्स पोलियो लसीकरण इत्यादी आरोग्य सेवा देण्यात येतात. त्या अनुषंगाने राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य कार्यक्रमा करीता सर्वसाधारण वर्गवारीसाठी (General) ६०% केंद्र हिस्सा त्यास समरुप ४०% राज्य हिश्श्याचे अनुदान राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णय :-</u>**

राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य कार्यक्रमाकरीता सर्वसाधारण वर्गवारीसाठी (General) लाभार्थ्यांकरिता सन २०१९-२० च्या अर्थसंकल्पीत तरतुदीतून केंद्र व राज्य हिस्सा वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. केंद्र शासनाचा ६०% केंद्र हिस्सा

याकरिता लेखाशिर्ष २२१०F१५७ खाली सन २०१९-२० या आर्थिक वर्षात रु.९२५५८.७९ लक्ष एवढी तरतुद अर्थसंकल्पित केलेली आहे आणि ४०% राज्य हिस्सा याकरिता लेखाशिर्ष २२१०५२४६ खाली सन २०१९-२० या आर्थिक वर्षात राज्य शासनाने रु.५७७४३.३० लक्ष एवढी मूळ तरतुद केलेली आहे. सदर कार्यक्रमाकरीता पहिल्या हफ्त्यापोटी केंद्र हिस्सा रु.४११०९.०० लक्ष व राज्य हिस्सा रु.२७४०६.०० लक्ष इतका निधी राज्य आरोग्य सोसायटीस वितरीत करण्यात आला आहे. सदर कार्यक्रमाकरीता सन २०१८-१९ या आर्थिक वर्षातील प्रलंबित तसेच पहिल्या हप्त्यापोटी केंद्र व राज्य हिस्स्याकरीता वितरीत करण्यात आलेल्या निधीचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

**(रु.लाखात)**

| अ. क्र. | शासन निर्णय दिनांक | केंद्र हिस्सा मूळ तरतूद | वितरीत केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा मूळ तरतूद | वितरीत राज्य हिस्सा |
|---|---|---|---|---|---|
| १ | ०९ ऑगस्ट, २०१९ | ९२५५८.७९ | २४१२.०० | ५७७४३.३० | १६०८.०० |
| २ | १८ सप्टेंबर, २०१९ | | ४११०९.०० | | २७४०६.०० |

२. सदर कार्यक्रमाकरीता केंद्र हिश्श्यापोटी रु.२५९८८.०० लक्ष (रु.दोनशे एकोणसाठ कोटी अठ्ठयाऐंशी लक्ष फक्त) इतकी रक्कम ६०% केंद्र हिस्सा व ४०% राज्य हिस्सा रु.१७३२५.३३ लक्ष (रु.एकशे त्र्याहत्तर कोटी पंचवीस लक्ष तेहेतीस हजार फक्त) राज्य आरोग्य सोसायटीस वितरीत करणे आवश्यक आहे. सदर लेखाशिर्षाखालील उपलब्ध तरतूदीनुसार अनुदान वितरीत करण्यात येत आहे.

३. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करून विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटी यांच्याकडे सुपुर्द करावी. यासाठी सह संचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, मुंबई यांना “नियंत्रण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर प्रस्तावावरील खर्च खालीलप्रमाणे नमूद केलेल्या योजना निहाय ६०% केंद्र हिश्श्यापोटी ४०% राज्य हिश्श्यापोटी नमूद लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१९-२० साठी मंजूर करण्यात आलेल्या उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

| अ. क्र. | तपशिल | केंद्र /राज्य हिस्सा (रु.लाखात) | | |
|---|---|---|---|---|
| | | लेखाशिर्ष | अर्थसंकल्पिय तरतुद | मागणी रक्कम (केंद्र ६०%/ राज्य हिस्सा ४०% ) |
| १ | आर-१ २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य; ०६, सार्वजनिक आरोग्य; ८००-इतर खर्च; सर्वसाधारण योजना (०१)(१८) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान केंद्र पुरस्कृत योजना (६० टक्के केंद्र हिस्सा) कार्यक्रम, ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | २२१०F१५७ | ९२५५८.७९ | २५९८८.०० |
| २ | आर-१ २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य; ०६, सार्वजनिक आरोग्य; ८००-इतर खर्च; सर्वसाधारण योजना (०१)(१५) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान केंद्र पुरस्कृत योजना (४० टक्के राज्य हिस्सा) कार्यक्रम, ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | २२१०५२४६ | ५७७४३.३० | १७३२५.३३ |

५. वित्त विभागाच्या दिनांक १ एप्रिल, २०१९ व दिनांक ०८ जुलै, २०१९ च्या शासन परिपत्रका सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.९ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटी व शर्तीची पूर्तता केली असल्याचे कार्यक्रम प्रमुख / संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी शासनास कळविले असून त्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक ८ जुलै, २०१९ च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्ठातील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटीच्या लेखापरिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप घेतलेले नाहीत. सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी पुरवठादाराच्या खात्यात थेट जमा होणार आहे. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच, भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक ०१/०४/२०१९ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे /अटी व शर्तीचे पालन करुन त्यासंदर्भात आवश्यक ते प्रमाणपत्र सादर करणे अथवा आवश्यक त्या बाबी स्वतंत्रपणे प्रमाणित करणे राज्य आरोग्य सोसायटीस अथवा सदरहू निधी ज्या यंत्रणेमार्फत खर्च करण्यात येणार त्या कार्यक्रम प्रमुखास बंधनकारक राहील.

६. सदरील अनुदान सशर्त असून वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/ अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

७. सदर प्रस्तावावरील खर्च शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीबाबत प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

८. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक ४००/अर्थोपाय, दिनांक ०७ नोव्हेंबर, २०१९ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201911271232360617 असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind Raghunath Kulkarni

Digitally signed by Milind Raghunath Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, cn=Milind Raghunath Kulkarni
Date: 2019.11.27 12:52:00 +05'30'

**( मिलिंद कुळकर्णी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. संचालक (आरोग्य सेवा-२), आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
६. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे .
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. वित्त विभाग ( अर्थसंकल्प) (अर्थोपाय) व व्यय-१३, मंत्रालय, मुंबई.
११.कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग .
१२.निवडनस्ती ( आरोग्य -७) .